**प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, ठेपणपाडा, ता.दिंडोरी, जि.नाशिक वर्ग-४ च्या कर्मचारी निवासस्थानाच्या व आश्रमशाळा संकुल दुरुस्तीबाबतच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याबाबत....**

महाराष्ट्र शासन
आदिवासी विकास विभाग,
शासन निर्णय क्रमांक : शाआदु-२०१०/प्र.क्र.५३/का.१३
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२.
दिनांक : ३० जानेवारी,२०१०.

**<u>शासन निर्णय</u>** : प्रकल्प अधिकारी,एकात्मिक आदिवासी विका[illegible]कल्प, नाशिक यांच्या कार्यक्षेत्रातील शासकीय आश्रमशाळा, ठेपणपाडा, ता.दिंडोरी जि.नाशिक वर्ग-४ च्या कर्मचारी निवासस्थानाच्या दुरुस्तीबाबतचे रु.४,९१,१२९/- व आश्रमशाळा संकुल दुरुस्तीचे रु.४,९०,३३०/- इतक्या रकमेच्या दोन अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याचा प्रस्ताव विचाराधीन आहे.

२. सदर अंदाजपत्रके संबंधित सहायक अभियंता, श्रेणी-२ यांनी तयार केली असून उप विभागीय अभियंता, सा.बां.उपविभाग क्र.२, दिंडोरी यांनी तपासली आहेत. तसेच उप विभागीय अभियंता, सा.बां. उपविभाग, क्र.२, दिंडोरी व कार्यकारी अभियंता, सा.बां.(उत्तर)विभाग, नाशिक यांनी साक्षांकित केली आहेत.

सदर अंदाजपत्रके सन २००८-०९ च्या दरसूचीवर आधारित आहेत.

३. सदर काम दुरुस्तीचे असून प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प,नाशिक यांचे कार्यक्षेत्रातील उपरोक्त शाळेच्या दुरुस्तीच्या दोन अंदाजपत्रकामध्ये समाविष्ट केलेले १५% सेंटेज चार्जेस वगळून अंदाजपत्रकांना खालीलप्रमाणे प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे :-

| अ.क्र. | दुरुस्तीची बाब | अंदाजपत्रकीय रक्कम |
|---|---|---|
| १ | वर्ग-४ कर्मचारी निवासस्थान दुरुस्ती | रु.४,२७,०६९/- |
| २ | आश्रमशाळा संकुल दुरुस्ती | रु.४,२६,२७४/- |
| | | **रु.८,५३,३४३/-** |

४. मा.उच्च न्यायालय, मुंबई यांनी सु मोटो रिट याचिका क्र.१४२०/२००८ प्रकरणी वेळोवेळी दिलेल्या निर्देशानुसार शासकीय आश्रमशाळांमध्ये चांगल्या सोयीसुविधा पुरविणे

आवश्यक आहे. सदर काम सुरु होण्यापूर्वी व काम पूर्ण झाल्यावर त्याचे व्हीडीओ शुटींग करण्यात यावे.

५. सदर दुरुस्तीचा खर्च सन २००९-१० या वर्षाकरिता मंजूर असलेल्या तरतूदीमधून भागविण्यात यावा.

६. शासन निर्णय, वित्त विभाग क्र.विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/विनियम, दिनांक १५ मे, २००९ मधील वित्तीय अधिकार नियम पुस्तिका, १९७८, भाग-पहिला, उपविभाग-पाच मधील अ.क्र.१ व सा.बां.विभाग नियम पुस्तिकेतील परिच्छेद १३४ नुसार प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

७. सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या वेबसाईटवर उपलब्ध करुन देण्यांत आला असून त्याचा संगणक सांकेतांक क्रमांक **२०१००१३०१८४-५४००१** असा आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावे,

( गी. मो. चांदे )
अवर सचिव

**प्रति,**
आयुक्त, आदिवासी विकास, महाराष्ट्र राज्य, नाशिक.
अपर आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
अधिक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ,नाशिक.
प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, नाशिक.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
महालेखापाल (लेखा परिक्षा), (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, नागपूर.
जिल्हा कोषागार अधिकारी, नाशिक.
कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, नाशिक.
उप विभागीय अभियंता, सार्वजनिक बांधकाम उप विभाग क्र.२, दिंडोरी.
कक्ष अधिकारी (का.६), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
निवड नस्ती (का.१३), आदिवासी विकास विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.